**कुटीर रुग्णालय, कलेढोण, ता.खटाव, जि. सातारा येथील कुटीर रुग्णालयाचे नामकरण “माजी मुख्यमंत्री स्वर्गीय बॅरिस्टर बाबासाहेब भोसले कुटीर रुग्णालय” करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१६/प्र.क्र.१२९/आरोग्य-४**

सार्वजनिक आरोग्य विभाग
गो.ते.रुग्णालय, आवार संकुल इमारत, १० वा मजला, मुंबई ४०० ००१
तारीख: १८ जानेवारी, २०१७

**वाचा**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१२/प्र.क्र.१९२/१२ /आरोग्य ३ अ, दिनांक १ जून, २०१२**

**प्रस्तावना**

मौजे कलेढोण ता.खटाव, जि.सातारा हे महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री स्वर्गीय बॅरिस्टर बाबासाहेब भोसले यांचे जन्मगाव असल्याने तेथील कुटीर रुग्णालयास त्यांचे नाव देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक १ जून, २०१२ मधील तरतुदी शिथील करुन मौजे कलेढोण, ता. खटाव, जि. सातारा येथील शासकीय कुटीर रुग्णालयाचे नामकरण “माजी मुख्यमंत्री स्वर्गीय बॅरिस्टर बाबासाहेब भोसले कुटीर रुग्णालय” करण्यास एक विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

सदर नामकरण करण्याचा निर्णय अन्य प्रकरणी पुर्वोदाहरण म्हणून समजता येणार नाही, या अटीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११९१४१५१९५११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Rambhaji Dahiphale

Digitally signed by Vivek Rambhaji Dahiphale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=56142975484e58364afe88f5f0e3138e3ce0d4e4058e42f003dfd69500064afb, cn=Vivek Rambhaji Dahiphale
Date: 2017.01.19 15:31:33 +05'30'

**(वि.रं.दहिफळे)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव
२. मा.मंत्री (सा.आ. व कु.क.) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (सा.आ. व कु.क.) यांचे खाजगी सचिव

४. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
५. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
६. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७. जिल्हाधिकारी, सातारा
८. उप संचालक, सार्वजनिक आरोग्य मंडळ, पुणे
९. जिल्हा शल्यचिकित्सक, सातारा
१०. सार्वजनिक आरोग्य विभागातील सर्व अधिकारी